महाराष्ट्र - कर्नाटक सीमाप्रश्न आंदोलनातील हुतात्म्यांच्या वारसांना निवृत्तीवेतन व इतर आर्थिक लाभ.
वित्तीय वर्ष २०२४-२०२५ मधील जानेवारी, २०२५ ते मार्च, २०२५ या महिन्यांकरिता अनुदानाचे वाटप.

# महाराष्ट्र शासन

## सामान्य प्रशासन विभाग

## शासन निर्णय, क्रमांक : बियुडी-१८२४/प्र.क्र.२२/२०२४/सीमाप्र

मंत्रालय, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई - ४०० ०३२.

**दिनांक : २४ फेब्रुवारी, २०२५**

**संदर्भ :-** १. शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. अर्थसं-२०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३, दि.०१.०४.२०२४,
२. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक : बियुडी-१८२४/प्र.क्र.२२/२०२४/सीमाप्र, दि.१८.०४.२०२४,
३. शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. अर्थसं-२०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३, दि.२५.०७.२०२४,
४. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक : बियुडी-१८२४/प्र.क्र.२२/२०२४/सीमाप्र, दि.१०.०९.२०२४,
५. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक : बियुडी-१८२४/प्र.क्र.२२/२०२४/सीमाप्र, दि.२७.१२.२०२४,
६. शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि.१५.०२.२०२५,

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र - कर्नाटक सीमा आंदोलनातील एकूण ११ हुतात्म्यांच्या वारसांना प्रत्येकी रु.२०,०००/- दरमहा इतके निवृतिवेतन, वार्षिक प्रवास भत्ता रु.५००/- व आकस्मिक मदत म्हणून प्रत्येकी रु.५०००/- वार्षिक याप्रमाणे आर्थिक लाभ शासनाने अनुज्ञेय केले आहे. सदर लाभ अदा करण्यासाठी "मागणी क्र.ए-५, २२३५ - सामाजिक सुरक्षा व कल्याण, ६०-इतर सामाजिक सुरक्षा व कल्याण कार्यक्रम - १०२ - सामाजिक सुरक्षा योजनेखाली निवृतीवेतन- (००) (०३) महाराष्ट्र-कर्नाटक सीमा आंदोलनातील हुतात्म्यांचे वारसांना निवृत्तीवेतन (२२३५ २४९३)" या लेखाशीर्षाअंतर्गत सन २०२४-२०२५ या वित्तीय वर्षासाठी एकूण रु.२९,४६,०००/- एवढी अर्थसंकल्पीय तरतूद मंजूर करण्यात आली आहे. त्यापैकी वित्त विभागाने उपरोक्त संदर्भाधीन क्र.१ येथील दि.०१/०४/२०२४ च्या शासन परिपत्रकान्वये माहे एप्रिल ते जुलै, २०२४ या चार महिन्याचा खर्च करण्यास दिलेल्या मंजूरीनुसार, बिडीएस वर उपलब्ध झालेल्या अनुदानातून संदर्भ क्र.२ येथील दिनांक १८.०४.२०२४ रोजीच्या शासन निर्णयांन्वये, रु.९,००,५००/- इतके अनुदान, माहे एप्रिल ते जुलै, २०२४ या चार महिन्याचा, संदर्भ क्र.४ येथील दिनांक १०.०९.२०२४ रोजीच्या शासन निर्णयांन्वये, रु.४,४०,५००/- इतके अनुदान, माहे ऑगस्ट व सप्टेंबर, २०२४ या दोन महिन्याचा व संदर्भ क्र.५ येथील दिनांक २७.१२.२०२४ रोजीच्या शासन

निर्णयांन्वये, रु.३,००,०००/- इतके अनुदान, माहे ऑक्टोबर ते व डिसेंबर, २०२४ या तीन महिन्याचा खर्च भागविण्याकरीता, संबंधीत जिल्हाधिकारी यांना वितरित करण्यात आले आहे. आता, २२३५२४९३ या लेखाशिर्षाखाली माहे एप्रिल,२०२४ ते फेब्रुवारी, २०२५ अखेरपर्यंत बिडीएस वर उपलब्ध एकूण रु.२५,०४,१००/- इतके अनुदानापैकी वरील प्रमाणे एकूण रु.१६,४०,५००/- वितरीत तरतूद विचारात घेता बिडीएस वर रु.९,३६,६००/- एवढी तरतूद वितरणासाठी उपलब्ध आहे.

शासन निर्णय:-

२. त्यानुसार आता महाराष्ट्र - कर्नाटक सीमा आंदोलनातील सध्या असलेल्या एकूण ९ हुतात्म्यांच्या वारसांना प्रत्येकी रु.२०,०००/- दरमहा इतके निवृतिवेतनाकरीता, जानेवारी ते मार्च, २०२५ या तीन महिन्यांचा खर्च भागविण्यासाठी खालील विवरण पत्रानुसार एकूण रु.५,४०,०००/- (रुपये पाच लाख चाळीस हजार फक्त) एवढे मंजूर अनुदान स्तंभ क्र.९ मध्ये निर्देशित केलेल्या आहरण व संवितरण अधिकाऱ्यांकडे सुपूर्द करण्यात येत आहे. त्यांनी वित्त विभागाच्या संदर्भाधीन शासन परिपत्रकामधील त्यांच्याशी संबंधित मार्गदर्शक सूचनांचे पालन करण्याच्या अधिन राहून सन २०२४-२५ मधील अनुदान विहित पध्दतीनुसार खर्च करण्याची दक्षता घ्यावी.

| अ. क्र. | मागणी क्रमांक | योजनेचे नाव व लेखाशिर्ष | अर्थसंकल्पीय तरतुद सन २०२४-२५ | आहरण व संवितरण अधिकारी | एप्रिल ते जुलै, २०२४ करीता वितरीत केलेली तरतुद (रुपये) | ऑगस्ट ते सप्टेंबर, २०२४ करीता वितरीत केलेली तरतुद (रुपये) | ऑक्टोबर ते डिसेंबर, २०२४ करीता वितरीत केलेली तरतुद (रुपये) | जानंवारी ते मार्च, २०२५ करीता वितरीत करण्यात येणारी तरतुद (रुपये) |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ |
| १ | ए-५ | २२३५-सामाजिक सुरक्षा व कल्याण, २२३५२४९३ | रु.२९,४६,००० | १) मुंबई शहर (एकूण ३ लाभार्थी) | २,४६,५०० | १,२०,००० | १,८०,००० | १,८०,००० |
| | | | | २) कोल्हापूर (एकूण ५ लाभार्थी) | ५,६८,५०० | २,८०,००० | ६०,००० | ३,००,००० |
| | | | | ३) रत्नागिरी (एकूण १ लाभार्थी) | ८५,५०० | ४०,००० | ६०,००० | ६०,००० |
| | | | | **एकूण** | **९,००,५००** | **४,४०,०००** | **३,००,०००** | **५,४०,०००** |

३. तसेच सदर लेखानुदान पुढील अटींच्या अधीन राहून वितरीत करण्यात येत आहे :-

१) माहे जानेवारी, २०२५ ते मार्च, २०२५ या ३ महिन्यांचा खर्च संबंधित जिल्हाधिकारी यांनी त्यांना वितरीत केलेल्या तरतुदी इतक्या मर्यादेत राहील याची दक्षता घ्यावी.

२) संबंधित जिल्हाधिकारी यांनी उक्त बाबीवर होणाऱ्या खर्चाची वेगळी नोंद ठेवून महालेखापाल कार्यालयामधील खर्चाच्या नोंदीशी ताळमेळ घालून त्याचे विवरणपत्र या कार्यासनासह सामान्य प्रशासन विभाग/ कार्यासन-अर्थसं व वित्त विभाग यांच्याकडे विहित मुदतीत सादर करावी. तसेच कुठल्याही परिस्थितीत "२२३५२४९३" या लेखाशीर्षाखालीच या रकमा त्या त्या महिन्यात खर्ची पडत असल्याची व त्याबाबत खर्चमेळाद्वारे खातरजमा करण्याची जबाबदारी संबंधित जिल्हाधिकारी यांची राहील.

३) जिल्हाधिकारी, मुंबई शहर, कोल्हापूर व रत्नागिरी यांनी एप्रिल, २०२४ ते डिसेंबर, २०२४ या महिन्याचा खर्च, अधिदान व लेखाधिकारी या कार्यालयाशी संपर्क साधून बीम्स प्रणालीवर नमूद खर्च त्या-त्या महिन्यात खर्ची पडत असल्याची खातरजमा करुन तसे प्रमाणपत्र प्रत्येक महिन्याच्या १० तारखेच्या आत GAD_३६२@maharashtra.gov.in या ई-मेल वर पाठविण्याची जबाबदारी संबंधीत जिल्हाधिकारी कार्यालय यांची राहील.

४. सदर शासन निर्णय, प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या शक्तीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२५०२२४१५४९२५९२०७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RAJENDRA
GOPALKRISHNA
GAIKWAD

Digitally signed by RAJENDRA GOPALKRISHNA GAIKWAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=e18e8c2154c8ecbcf0edc1fcc5b3e74c50aa53537f32c40ea2c1af9814e56681, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=021D4BA37C61940F8B373F5BEB2D6BCA43B8F4858CE3ADE3FD42291B9038E881, cn=RAJENDRA GOPALKRISHNA GAIKWAD
Date: 2025.02.24 15:50:32 +05'30'

**( रा. गो. गायकवाड )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत, माहिती व आवश्यक कार्यवाहीसाठी रवाना :-**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता ) / महालेखापाल (लेखा परीक्षा) , महाराष्ट्र- १, मुंबई.
२. संचालक, लेखा व कोषागारे (संगणक शाखा), मुंबई.
३. प्रधान सचिव (व्यय) / लेखा व कोषागरे, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. जिल्हाधिकारी, मुंबई शहर जिल्हा, जुने जकात गृह, फोर्ट, मुंबई-२३.
५. जिल्हाधिकारी, रत्नागिरी व कोल्हापूर.
६. जिल्हाधिकारी, मुंबई उपनगर जिल्हा, वांद्रे (पूर्व) मुंबई-५१ यांना असे कळविण्यात येते की, त्यांना आवश्यक असलेले अनुदान जिल्हाधिकारी, मुंबई शहर यांच्याकडून मागविण्यात यावे.
७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
८. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
९. जिल्हा कोषागार अधिकारी, रत्नागिरी, पुणे व कोल्हापूर.
१०. सामान्य प्रशासन विभाग / कार्यासन-२५, मंत्रालय, मुंबई.
11. निवड नस्ती (कार्या.३६).